**श्रीसंत गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सव शेगांव तीर्थक्षेत्र विकास आराखडा स्वीय प्रपंजी खात्यास मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- तीक्षेवि-२०१३/प्र.क्र.१२/१४४४,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १८ ऑगस्ट, २०१७.

वाचा :- १) शासन निर्णय क्र.तिक्षेवि-२०१०/प्र.क्र.२६/का.१४४४ दि. २८ मार्च, २०१०
२) शासन निर्णय क्र.तिक्षेवि-२०१३/प्र.क्र.१२/का.१४४४ दि. ३० जानेवारी, २०१५
३) शासन निर्णय क्र.तिक्षेवि-२०१३/प्र.क्र.१२/का.१४४४ दि. २८ जुलै, २०१५
४) शासन निर्णय क्र.तिक्षेवि-२०१२/प्र.क्र.२४/का.१४४४ दि. १८ जानेवारी, २०१६
५) शासन निर्णय क्र.तिक्षेवि-२०१६/प्र.क्र.२३/का.१४४४ दि. ७ मे, २०१६
६) शासन निर्णय क्र.तिक्षेवि-२०१३/प्र.क्र.१२/का.१४४४ दि. २६ जुलै, २०१६
७) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्रआकाअ/शेतीविआ/स्वीप्रखा/७५/२०१७ दि. २४ मार्च, २०१७

**प्रस्तावना:-**

श्रीसंत गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सवानिमित्त शेगांव येथे तीर्थक्षेत्री मूलभूत सुविधा निर्माण करण्यासाठी, शासनामार्फत उपलब्ध करून देण्यात आलेला निधी कोषागारातून आहरित करून विभागीय आयुक्त, अमरावती यांच्या नांवे स्वीय प्रपंजी खात्यामध्ये जमा करण्यास संदर्भाधीन दि.२८.३.२०१० च्या शासन निर्णयान्वये, मान्यता देण्यात आली आहे. सदर स्वीय प्रपंजी खात्यास संदर्भाधीन दि. २६.७.२०१६ च्या शासन निर्णयान्वये दि. ३१ मार्च, २०१७ पर्यंत मुदतवाढ दिली आहे. या आराखड्याच्या न्यायालयीन प्रकरणी (रिट पिटिशन क्र. ५८५६/२००७) मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठाने दि. १७.६.२०१५ व दि. १४.१.२०१६ रोजी दिलेल्या निदेशानुसार आराखड्यातील कामांसाठीचा निधी विभागीय आयुक्त, अमरावती यांचे नावे उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी खात्यामध्ये (क्र. ००८४८४) जमा करणे क्रम:प्राप्त आहे. सदर आराखड्यातील कामे माहे डिसेंबर, २०१७ पर्यंत पूर्ण करण्यास अनुक्रमांक ५ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. तसेच विभागीय आयुक्त, अमरावती यांनी अनुक्रमांक ७ येथील पत्रान्वये विनंती केल्यानुसार, स्वीय प्रपंजी खात्यातील अखर्चित रक्कम खर्च करण्यासाठी स्वीय प्रपंजी खात्यास दि. ३१ मार्च, २०१७ च्या पुढे मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

श्रीसंत गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सव शेगांव तीर्थक्षेत्र विकास आराखडा विहित कालावधीत पूर्ण करण्याकरिता विभागीय आयुक्त, अमरावती यांच्या नांवे उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी खात्यास दिनांक ३१ मार्च, २०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यास व स्वीय प्रपंजी खात्यातील अखर्चित रक्कम आर्थिक वर्ष २०१७-१८ मध्ये आराखड्यांतर्गत मुलभूत सुविधा निर्माण करण्यासाठी खर्च करण्यास महालेखापाल-१ महाराष्ट्र यांनी खालील अटींच्या अधीन, दिलेल्या मान्यतेनुसार शासन मान्यता देण्यात येत आहे. या कार्यक्रमासाठी स्वीय प्रपंजी खाते वापरताना खालील बाबींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे:-

१) दि. ३१ मार्च, २०१७ पर्यंत चा अखर्चित निधी, दि. ३१ मार्च, २०१८ पर्यंत खर्च न झाल्यास सदर अखर्चित निधी महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम क्र.४९५ परि. ३ मधील तरतूदीनुसार राज्य शासनाच्या एकत्रीत निधीत जमा करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

२) तसेच सदर स्वीय प्रपंजी खाते उघडताना नमुद करण्यात आलेल्या अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १५७/१७/कोषा प्र-५ दिनांक २४ जुलै, २०१७ अन्वये, तसेच महालेखापाल कार्यालयाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक TM/Ch.२/UOR/Planning Department/२०१७-१८/४९९, दिनांक १० ऑगस्ट, २०१७ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१७०८१८१७०८५७१४१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Maya Roop Vasudeo
Date: 2017.08.18 17:00:07 +05'30'

**(मा. रु. वासुदेव)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत :-**

१) मा. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/ विधान सभा यांचे स्वीय सहायक, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), महाराष्ट्र -१, मुंबई.

३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.

४) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.

५) जिल्हाधिकारी, बुलढाणा.

६) जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा.

७) शासकीय अभियोक्ता, मुंबई उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ, नागपूर

८) वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६)/(कोषा.प्र.-५, मंत्रालय, मुंबई.

९) नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई.

१०) निवड नस्ती/का-१४४४, मंत्रालय, मुंबई.

***********